“कंत्राटी कर्मचा-यांच्या नियुक्तीचे अधिकार जिल्हा कार्यक्रम समन्वयक तथा जिल्हाधिकारी यांच्याऐवजी सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक तथा मुख्य कार्यकारी अधिकारी यांना प्रदान करणेबाबत”

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन (रोहयो) विभाग**

**शासन शुध्दीपत्रक क्रमांक :- मग्रारो-२०२३/प्र.क्र.३३/रो-७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ‍§ ४०० ०३२

दिनांक :- १५ फेब्रुवारी, २०२३

**वाचा :**

१) नियोजन (रोहयो) विभाग शासन निर्णय क्र.आस्थाप-२०१७/प्र.क्र.१०२/मग्रारो-३ दिनांक २९ सप्टेंबर, २०१७

२) नियोजन (रोहयो) विभागाचे शासन परिपत्रक क्र.मग्रारोहयो-२०२०/प्र.क्र.२१/रोहयो-७, दिनांक ०५ ऑगस्ट, २०२०

३) नियोजन (रोहयो) विभाग शासन परिपत्रक क्र. मग्रारोहयो-२०२०/प्र.क्र.२१/रोहयो-७, दिनांक ०२ सप्टेंबर, २०२०

४) नियोजन (रोहयो) विभाग शासन परिपत्रक क्र. मग्रारोहयो-२०२०/प्र.क्र.३०/रोहयो-७, दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१२

५) नियोजन (रोहयो) विभाग शासन निर्णय क्र.मग्रारो-२०२०/प्र.क्र.७७/रोहयो-७, दिनांक २५ ऑगस्ट, २०२१

**प्रस्तावना :**

२. नियोजन (रोहयो) विभाग शासन निर्णय क्रमांक आस्थाप-२०१७/प्र.क्र.१०२/मग्रारो-३ दिनांक २९ सप्टेंबर, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या अंमलबजावणी करणा-या जिल्हा कार्यक्रम समन्वयक तथा जिल्हाधिकारी व सह जिल्हा कार्यक्रम समन्वयक तथा मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे मध्ये कामाची जबाबदारी निश्चित करण्यात आलेली आहे.

३. तथापि, उपरोक्त शासन निर्णयाची काटेकोरपणे अंमलबजावणी होत नसल्याने त्याचा कामकाजावर विपरीत परिणाम होत असल्याचे शासनाच्या निर्दशणास आले आहे.

४. सद्य:परिस्थितीत जिल्हयातील मनरेगांतर्गत एकूण कामांचे ८० ते ९० टक्के कार्ये पंचायत यंत्रणेकडून करण्यात येत असल्यामुळे जिल्हा परिषद, पंचायत समिती व पंचायत यंत्रणेकडे सर्व कर्मचाऱ्यांची आस्थापना विषयक अधिकार सह जिल्हा कार्यक्रम समन्वयक तथा मुख्य कार्यकारी अधिकारी यांना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुद्धीपत्रक :-**

१. नियोजन (रोहयो) विभागाच्या दिनांक २५ ऑगस्ट, २०२१ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये, सीएससी एसपीव्ही ई गव्हर्नन्स सर्विसेस इंडीया लिमिटेड या केंद्र पुरस्कृत उपक्रमाव्दारे नियोजन (रोहयो) विभागाकरिता कंत्राटी पध्दतीने उपलब्ध करुन घेतलेल्या मनुष्यबळाचे व्यवस्थापन धोरण निश्चित करण्यात आलेले आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक २ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कंत्राटी पध्दतीने नवीन मनुष्यबळ उपलब्ध करुन घेण्याचा प्रस्ताव जिल्हा कार्यक्रम समन्वयक तथा जिल्हाधिकारी यांच्याऐवजी सह जिल्हा कार्यक्रम समन्वयक तथा मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्यामार्फत सादर करावा असे प्रस्तावित करण्यात येत आहे.

२. तसेच, नियोजन (रोहयो) विभागाच्या दिनांक २९ सप्टेंबर, २०१७ रोजीच्या शासन निर्णयातील अनुक्रमांक २३ मध्ये नमूद केलेल्या कंत्राटी कर्मचा-यांचे नियुक्तीचे अधिकार हे जिल्हा कार्यक्रम समन्वयक तथा जिल्हाधिकारी यांना प्रदान करण्यात आले आहे, त्यात अंशत: बदल करुन केवळ पंचायत यंत्रणेकडील कार्यरत कंत्राटी कर्मचाऱ्यांबाबतीत त्यांच्याऐवजी सह जिल्हा कार्यक्रम समन्वयक तथा मुख्य कार्यकारी अधिकारी यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे या कंत्राटी कर्मचाऱ्यांच्या शिस्त व सेवा विषयक बाबींचे अधिकार सह जिल्हा कार्यक्रम तथा मुख्य कार्यकारी अधिकारी यांना राहतील.

३. सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०२१६१६०६०८९८१६ असा आहे. हे शुद्धीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NANDKUMAR VERMA

Digitally signed by NANDKUMAR VERMA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DCD3577EBF0E05E2A8B57095C152DC6CFB37C2BB83DA197788645DD8A362EBC5, cn=NANDKUMAR VERMA
Date: 2023.02.16 16:17:33 +05'30'

**नंदकुमार**
**अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव.
२. मा. अपर मुख्य सचिव (रोहयो), यांचे स्वीय सहायक .
३. सर्व विभागीय आयुक्त
४. आयुक्त, कृषी आयुक्तालय, पुणे.
५. आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र, नागपूर

६. सर्व जिल्हाधिकारी
७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
८. सर्व उपायुक्त (रोहयो), विभागीय आयुक्त कार्यालये.
९. संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, पुणे.
१०. संचालक (मृद संधारण), कृषी आयुक्तालय, पुणे.
११. मुख्य अभियंता (मृद व जलसंधारण) सर्व.
१२. सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी
१३. सर्व जिल्हा रेशीम अधिकारी.
१४. सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो)
१५. सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (नरेगा, ग्रामपंचायत)
१६. सर्व गटविकास अधिकारी, नरेगा
१७. उपवनसंरक्षक (सर्व)
१८. उपसंचालक, सामाजिक वनीकरण (सर्व)
१९. वित्त विभाग (अर्थ-१६ , व्यय-८)
२०. नियोजन विभाग (का.१४३४ व का.१४२४)
२१. निवड नस्ती, रोहयो - ७.